जल जीवन मिशन अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठीचा राज्य हिश्श्याचा निधी वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ ए०९७ -राज्य हिस्सा)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजीमी-२०२३/प्र.क्र.२८/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,मंत्रालय
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: ३१ मार्च,२०२३

वाचा-

१. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि -२०१९/ प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०**
२. **केंद्र शासनाचे आदेश क्र.W-11020/197/2015-Water-I/40,दि.०९.०१.२०२३**
३. **शासन निर्णय, समक्रमांक दि.२३.०२.२०२३**
४. **केंद्र शासनाचे आदेश क्र.W-11020/197/2015-Water-I/76,दि.२७.०३.२०२३**
५. **शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. बीजीटी २०२२/ प्र.क्र.६६/ अर्थसंकल्प विघयो दि.३१.०३.२०२३**

प्रस्तावना-

संदर्भिय क्र.१ दि.०४.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन अंतर्गत केंद्र व राज्य वित्तीय आकृतीबंध ५०:५० असून अनुसूचित जाती घटक कार्यक्रमाकरीता केंद्र शासनाकडून निधी उपलब्ध करुन दिला जातो. जल जीवन मिशन अंतर्गत अनुसूचित जाती घटक कार्यक्रमाकरीता केंद्र शासनाने सन २०२२-२०२३ आर्थिक वर्षाकरीता संदर्भिय क्र.२ दि.०९.०१.२०२३ रोजीच्या आदेशान्वये रु.३८०.५८७८ कोटी इतका निधी प्रथम हप्त्यातील प्रथम भाग म्हणून उपलब्ध करुन दिला होता. त्यानुसार जल जीवन मिशन अनुसूचित जाती घटक कार्यक्रम समरुप राज्य हिश्श्याचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला संदर्भिय क्र.३ दि.२३.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आले आहेत. आता, केंद्र शासनाने संदर्भिय क्र.४ दि.२७.०३.२०२३ रोजीच्या आदेशान्वये प्रथम हप्त्यातील दुसरा भाग म्हणून अनुसूचित जाती घटक कार्यक्रमाकरीता रु.३५१.२२७२ कोटी

इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुसार जल जीवन मिशन अंतर्गत अनुसूचित जाती घटक कार्यक्रमाकरीता समरुप राज्य हिश्श्याचा निधी उपलब्ध करुन देण्याची सामाजिक न्याय विभागामार्फत वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. त्याअनुषंगाने सामाजिक न्याय विभागाच्या संदर्भिय क्र.५ दि.३१.०३.२०२३ रोजीच्या आदेशान्वये रु.३५१.२२७२ कोटी इतका निधी विभागास वितरित करण्यात आला आहे. सदरचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या ESCROW ACCOUNT मध्ये उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२२- २०२३ या आर्थिक वर्षामध्ये विशेष घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र. एन-३, लेखाशीर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा,७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रम, (०१) (०२) जल जीवन मिशन (राज्य हिस्सा) (५० टक्के) (कार्यक्रम) , ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) लेखाशीर्ष (२२१५ ए०९७) या लेखाशिर्षाखाली रु.३५१,२२,७२,०००/- (अक्षरी-रु. तीनशे एकावण्ण कोटी बावीस लक्ष बहात्तर हजार फक्त) इतका निधी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने वितरणास उपलब्ध करुन दिला आहे.

०२. सदर निधी तात्काळ राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक ९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

०४. जल जीवन मिशन अनुसूचित जाती घटक कार्यक्रमाखाली (विशेष घटक कार्यक्रम) उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षनिहाय/ उपलेखाशीर्षानिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ.माहिती आयुक्त, समाज कल्याण; उप आयुक्त, संबंधित प्रादेशिक उप विभाग तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व या विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

०५. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाचे अनौ.सं.क्र.४१२/व्यय १४, दि.३०.०३.२०२३ अन्वये प्राप्त मान्यता व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भिय क्र.५ च्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि.०४.०४.२०२२ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११००८२६८५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANUSHKA ANIRUDH DALVI

Digitally signed by ANUSHKA ANIRUDH DALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5edd45c6e1357ae0c8533741733e53bdac703b68fe52733dbcffe2914e0ac003, pseudonym=788F41926BA617FC3320DC8952A519D487C674CD, serialNumber=73F1FB9D6CBC3DAFBAD56FB8AD850EDE51730924E3CF0C7CD07F0DACC65316C5, cn=ANUSHKA ANIRUDH DALVI
Date: 2023.03.31 12:32:21 +05'30'

**(अनुष्का दळवी)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**
१. नियंत्रक अधिकारी तथा उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२.आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन, वित्त विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन पापु १०